**संसदीय कार्य विभागातील अधिकारी / कर्मचारी यांना घरबांधणी अग्रिम मंजुर करणेबाबत.**
**श्री.शे.तु.जाधव, सहायक**

**महाराष्ट्र शासन**
**संसदीय कार्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः घबांअ-२०१५/प्र.क्र.१२८/पाच**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक
मंत्रालय, मुंबई-४०००३२.
तारीख: १० नोव्हेंबर, २०१५

वाचा :-

१) शासन निर्णय वित्त विभाग क्रमांक घबांअ-२०१२/प्र.क्र.३०/२०१२/विनियम, दिनांक २० फेब्रुवारी, २०१५.
२) शासन निर्णय संसदीय कार्य विभाग, क्रमांकः घबांअ-२०१५/प्र.क्र.१२८/पाच, दिनांक २७ ऑक्टोबर, २०१५

अधिदान व लेखा अधिकारी यांना असे कळविण्याचे आदेश आहेत की, या विभागाकरीता सन २०१५-२०१६ या आर्थिक वर्षासाठी घरबांधणी अग्रिम या लेखाशिर्षाखाली उपलब्ध अर्थिक तरतुद विचारात घेता, उपरोक्त संदर्भाधिन अनुक्रमांक २ येथील शासन निर्णय रद्द करण्यात येत येत आहे.

श्री.शे.तु.जाधव, सहायक यांनी घरबांधणी अग्रिम या प्रयोजनासाठी एकूण रुपये २३,००,०००/- (रुपये तेवीस लाख फक्त) इतका निधी मंजुर करण्याबाबत त्यांच्या दिनांक २१ ऑगस्ट, २०१५ रोजीच्या अर्जान्वये विनंती केली आहे. त्यास अनुसरुन विभागाकडे उपलब्ध असलेली अर्थसंकल्पीय तरतूद विचारात घेऊन, त्यांना घरबांधणी अग्रिम मंजूर करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

श्री.शेखर तुकाराम जाधव, सहायक (मूळ वेतन रु.९७१० + ग्रेड वेतन रु.४३०० = १४०१०/-) यांना आर.के . बिल्डकॉम, बिल्डर ॲन्ड डेव्हलपर्स (मांडा) टिटवाळा, ता.कल्याण, जि. ठाणे यांच्याकडे सदनिका क्रमांक ३०३, बी-विंग, एकदंताय, सावरकर नगर, मांडा टिटवाळा येथे क्षेत्रफळ, ५२३ चौ. फुट, बांधकाम चालु असलेली सदनिका खरेदी करण्यासाठी रक्कम रुपये २३,००,०००/- (रुपये तेवीस लाख फक्त) एवढे घरबांधणी अग्रिम मंजूर करण्याची विनंती दिनांक २१/०८/२०१५ रोजीच्या अर्जान्वये या विभागाकडे केली आहे. श्री.जाधव हे दिनांक २६/०३/२००९ रोजी शासन सेवेत नियुक्त झाले असून, त्यांचा सेवानिवृत्तीचा दिनांक ३०/०६/२०४० असा आहे.

२. मुंबई वित्तीय नियम १९५९ च्या प्रकरण १० मधील नियम ११८ ते १३१ आणि प्रकरण ११ मधील नियम १३२ ते १४२ मधील अटी व शासनाने यामध्ये वारंवार केलेल्या सुधारणा तसेच शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक घबांअ-१०९०/(१८)/विनियम, दिनांक ११/७/१९९०, शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक घबांअ-१०८७/४६५/विनियम, दिनांक ६/११/१९९०, शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक बीजीएम१०९५/प्र.क्र.५४/९५/विनियम, दिनांक १०/०७/१९९५, शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक घबांअ-१०९९/प्र.क्र.२/९९/विनियम, दिनांक ०८/०७/१९९९, शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक घबांअ-१०११/प्र.क्र.५६/२०११/विनियम, दिनांक २७/०२/२०१२ व शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक

घबांअ-२०१२/प्र.क्र.३०/२०१२/विनियम, दिनांक २०/०२/२०१५ मधील विहित नियम / अटींचे काटेकोरपणे पालन करण्याच्या अधीन राहून श्री. शेखर तुकाराम जाधव, सहायक यांना उक्त नमूद सदनिका खरेदी करण्यासाठी रुपये २३,००,०००/- (रुपये तेवीस लाख फक्त) पैकी प्रथम हप्ता रु.३,५०,०००/- (अक्षरी रुपये तीन लाख पन्नास हजार फक्त) मंजूर करण्यात येत असून उर्वरीत रक्कम रु.१९,५०,०००/- बांधकामाच्या प्रगतीप्रमाणे मंजूर करण्यास याद्वारे शासन मंजूरी देण्यात येत आहे.

३. श्री.जाधव यांना मंजूर करण्यात आलेल्या रु.३,५०,०००/- (अक्षरी रुपये तीन लाख पन्नास हजार फक्त) या अग्रिमाची वसुली रु.२३८०/- चा प्रथम हप्ता व रु.१८२०/- चे १९१ समान हप्ते या प्रमाणे एकूण १९२ हप्त्यात मुद्दल व त्यापुढील ४८ हप्त्यात व्याजाच्या रक्कमेची वसुली करण्यात यावी. त्याअनुषंगाने या अग्रिमाच्या हप्त्याची वसूली अग्रिमाचा प्रथम हप्ता वितरीत केल्यानंतरच्या लगतच्या महिन्यापासून करण्यात यावी.

४. शासन परिपत्रक क्रमांक वित्त विभाग, विमास-१०९०/प्र.क्र.३४५/९०/लेपावि, दिनांक ६/२/१९९१ अनुसार श्री.शे.तु. जाधव, सहायक यांना वरील अग्रिम मंजूर केले असल्याने त्यांनी खरेदी केलेल्या सदनिकेचा विमा शासकीय विमा निधीकडे उतरविणे व अग्रीमाची व्याजासह परतफेड होईपर्यंत तो विमा चालू ठेवणे आवश्यक आहे.

५. व्याजदराबाबत अन्य आदेश निर्गमित होईपर्यंत शासन निर्णय, वित्त विभाग क्र.घबांअ-२०१२/प्र.क्र.३०/२०१२ विनियमन, दिनांक २०/०२/२०१५ अन्वये नमूद केल्यानुसार मंजूर करण्यात येणाऱ्या घरबांधणी अग्रिमातील रु.१५.०० लक्ष पर्यंतच्या रकमेवरील व्याजाची परिगणना शासन निर्णय, वित्त विभाग क्र.घबांअ-(व्याजदर)-१०१२/प्र.क्र.७/२०१२/विनियम, दिनांक १०/०५/२०१२ च्या शासन निर्णयान्वये निश्चित करण्यात आलेल्या ९.५० टक्के या दराने व त्यावरील रक्कमेच्या व्याजाची परिगणना (९.५० + २.००) टक्के म्हणजेच ११.५० टक्के या दराने करण्यात यावी. व्याजाची परिगणना वित्त विभागाच्या परिपत्रक क्र.अग्रिम-१०९९/प्र.क्र.४९/९९/विनियम, दिनांक ५ मे, २०१२ मध्ये नमूद केलेल्या पद्धतीने करण्यात यावी.

६. मंजूर करण्यात आलेल्या घरबांधणी अग्रिमाच्या प्रथम हप्त्याची रक्कम वितरित केल्यानंतर, कोणत्याही कारणास्तव पुढील अग्रिम न घेता प्रथम हप्त्यात घेतलेल्या अग्रिमाची रक्कम परत करून अग्रिम रद्द केल्यास, अग्रिम मंजूरीच्या दिनांकास प्रचलित असलेल्या व्याजदराने गणना करून रक्कम परतीच्या दिनांकापर्यंतच्या व्याजाची वसूली करण्यात यावी व त्यानंतर त्यांना पुन्हा घरबांधणी अग्रिम मंजूर करण्यात येवू नये.

७. तसेच ज्या प्रयोजनाकरिता अग्रिम मंजूर करण्यात आले आहे त्याच प्रयोजनासाठी त्याचा विनियोग न केल्यास किंवा अग्रिम व व्याज परतफेडीच्या संदर्भातील अटी व शर्तीचे पालन न केल्यास किंवा त्यात कोणत्याही प्रकारची कसूर झाल्यास, प्रचलित व्याजदर + २.७५ टक्के दंडनीय व्याजासह अग्रिमाची रक्कम एकरकमी वसूल करण्यात यावी.

८. श्री.जाधव, सहायक यांना कळविण्यात येते की, या शासन निर्णयान्वये मंजूर करण्यात आलेली रक्कम त्यांना अदा करण्यात येण्यापूर्वी त्यांनी नमुना "जी ३" मध्ये वैयक्तीक बंधपत्र व जागा ताब्यात घेतल्यानंतर **"जी ४" मध्ये जामीन बंधपत्र** (प्रत्येकी २ प्रतीत) व नोंदणीकृत गहाणखत सादर करावे. तसेच अग्रिमाची रक्कम प्राप्त झाल्यापासून तीन महिन्याच्या आत घर खरेदीची सर्व कागदपत्रे व अग्रिम विनियोगाचा पुरावा सादर करावा. त्याचप्रमाणे सदनिकेचा विमा शासकीय संचालनालयाकडून उतरविल्याचा पुरावा शासनास सादर करावा. तसेच शिल्लक घरबांधणी अग्रिम मुद्दल व व्याजाची वसूली परिभाषित अंशदायी निवृत्तीवेतन योजनेच्या रकमेतून वसूल करण्यासंदर्भात संमतीपत्र सादर करावे.

९. परिच्छेद क्रमांक १ मध्ये नमूद केलेली सदनिका श्री.शे.तु.जाधव व त्यांची पत्नी सौ.राखी शेखर जाधव अशा दोघांच्या संयुक्त नांवाने खरेदी करीत असल्याने शासन अधिसूचना क्र.एचबीए-१०७१/२१४३/७१/फ-१, दिनांक १/०१/१९७२ मधील तरतुदीनुसार त्यातील अटी व शर्तींच्या अधिन राहून त्यांना प्रस्तुत अग्रिम मंजूर करण्यात येत आहे.

१०. घरबांधणी अग्रिम रकमेच्या नियमित व योग्य वसूलीसाठी श्री.जाधव हे स्वत: जबाबदार राहतील. तसेच ते अनधिकृत रजेवर राहिल्यास अथवा इतर कोणत्याही कारणास्तव कर्तव्यापासून दूर राहिल्यास किंवा अन्य विभागात बदली झाली, तरीही घरबांधणी अग्रिम तसेच शासनाकडील इतर अन्य अग्रिमांची नियमित परतफेड करण्यास श्री.जाधव हे व्यक्तीश: जबाबदार राहतील.

११. यावर होणारा खर्च “मागणी क्रमांक पी-३, मुख्य लेखशिर्ष ७६१० शासकीय कर्मचाऱ्यांना कर्जे, घरबांधणी अग्रिम ( ७६१० ०८२८ ) या लेखाशिर्षांतर्गत सन २०१५-२०१६ या आर्थिक वर्षाच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

१२. प्रस्तुत शासन निर्णय वित्तिय अधिकार नियम पुस्तिका, १९७८ मधील भाग- पहिला, उप विभाग एक मधील मुंबई वित्तीय नियम १९५९ अंतर्गत नियमांखालील अनुक्रमांक ११ येथील नियम क्रमांक १३४ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या वित्तिय अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५१११०१५२५३२२४१५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Sanjay Vasudeo Jadhav

Digitally signed by Sanjay Vasudeo Jadhav
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Desk Officer, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Sanjay Vasudeo Jadhav
Date: 2015.11.10 15:29:25 +05'30'

**( सं.वा.जाधव)**
**कार्यासन अधिकारी,महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.

प्रत अग्रेषित :-

१) महालेखापाल- १ (लेखा व अनुज्ञेयता) / (लेखा परीक्षा), महाराष्ट्र मुंबई.
२) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
३) रोख शाखा (दोन प्रती), संसदीय कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई-४०००३२.
(आवश्यक नोंद सेवापुस्तकात घेण्यात यावी.)
४) श्री.शे.तु.जाधव, सहायक, संसदीय कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
५) निवड नस्ती. / वैयक्तिक नस्ती.